**कांदळवनाचे (mangroves)संरक्षण व संवर्धन करण्यासाठी पोलीस अधिका-यांची नेमणूक करण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

परिपत्रक क्रमांक : सीआरटी २००५/सीआर ७१०/पोल-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक: २ नोव्हेंबर,२००५

***परिपत्रक*** :- महाराष्ट्रातील कांदळवनाचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी तसेच कांदळवनाची तोड व -हास रोखण्यासाठी त्वरीत उपाययोजना करण्याचे आदेश देण्यासाठी मुंबई पर्यावरण कृती गट व इतर यांनी मा. उच्च न्यायालय,मुंबई यांच्याकडे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.३२४६/२००४ मध्ये दिनांक ६.१०.२००५ रोजी मा. उच्च न्यायालयाने आदेश पारीत केले आहेत. सदर आदेश लक्षात घेवून जिल्हयाच्या ठिकाणी पोलीस अधीक्षक व आयुक्तालय क्षेत्रात त्या-त्या परिमंडळाचे पोलीस उपायुक्त यांना कांदळवनाचे संरक्षण व संवर्धनाबाबत तक्रारी प्राप्त झाल्यास त्याबाबत कार्यवाही करण्यासाठी जबाबदार अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

उच्च न्यायालयाने खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत.

(अ) कांदळवनाची तोड व -हास होत आहे अथवा कसे, याबाबत जनतेच्या तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची त्वरीत दखल घेऊन कार्यवाही करणे
(ब) गुन्हेगारांची संख्या व नावे
(क) सदर गुन्हेगारांविरुध्द गुन्हा नोंदवून कार्यवाही करणे

२. कांदळवनाची तोड व -हास रोखण्यासाठी जिल्हयाच्या ठिकाणी पोलीस अधीक्षक व आयुक्तालयाच्या क्षेत्रात त्या-त्या परिमंडळाचे पोलीस उपआयुक्त यांनी तक्रारीची दखल घेऊन योग्य ती कार्यवाही करावी. याचिकाकर्त्यांनी याचिकेमध्ये असे नमूद केले आहे की, कांदळवनाची तोड होत असल्याबाबत नागरीकांकडून तक्रारी प्राप्त होत असून विशेषत: मुंबईतील खालील भागांमध्ये कांदळवनाची मोठया प्रमाणात तोड होत असल्याचे दिसून आले असल्यामुळे संबंधित पोलीस स्टेशनच्या प्रभारी अधिका-यांनी याबाबत दक्षता घ्यावी.

१) सातबंगला, अंधेरी (पश्चिम)
(२) कांजूरमार्ग
(३) लिंक रोड, गोरेगाव
(४) गोराई, बोरीवली (पश्चिम)
(५) मालवणी गाव, मालाड (पश्चिम)

पोलीस अधिका-यांचे नाव, पदनाम व दूरध्वनी क्रमांक सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद करण्यात आले आहेत.पोलीस महासंचालकांनी तसेच पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी या शासन परिपत्रकास एक इंग्रजी व दोन मराठी वर्तमानपत्रात व्यापक प्रसिध्दी द्यावी.

३. गृह विभागाशी संबंधित वरील कार्यवाही पोलीस महासंचालक व पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांनी तातडीने करावयाची आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना.रा.शेरे)
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय,मुंबई
सर्व पोलीस आयुक्त
सर्व पोलीस अधीक्षक
निवड नस्ती (पोल-११)

# परिशिष्ट

| | नाव | पदनाम | दूरध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|
| बृहन्मुंबई आयुक्तालय | १) श्री. नवल बजाज | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-१,फोर्ट,मुंबई-१ | २२६२०४५३ |
| | २)श्री.पी.आर.दिघावकर | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-२, भायखळा, मुंबई-८ | २३०७३६६३ |
| | ३)श्री.संतोष रस्तोगी | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-३, बावला कंपाऊंड, मुंबई-८ | २३७००६०८ |
| | ४)श्री.अे.आर.शिंदे | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-४, माटुंगा, मुंबई -१९ | २४०२११०१ |
| | ५)श्री. डी. जी. श्रीराव | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-५ वरळी, मुंबई-१८ | २४९७६९६० |
| | ६)श्री. एस. व्ही. मोहीते | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-६ चेंबूर, मुंबई-७१ | २५२२९३०३ |
| | ७)श्रीमती मेरी फर्नांडीस | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-७ मुलुंड (पश्चिम),मुंबई- ८० | २५६४५२२८ |
| | ८)श्री. शशिकांत शिंदे | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-८ बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स,मुंबई-५१ | २६५०८३८१<br>२६५२४५६१ |
| | ९)श्री.अमिताभ गुप्ता | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-९, बांद्रा (पश्चिम), मुंबई-५० | २६४२२०४२ |
| | १०)श्री.आर.पी.सेनगावकर | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-१०, अंधेरी (पूर्व), मुंबई | ८३६७७६७ |
| | ११)श्री.डी.आर.कराळे | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-११, बोरीवली (पश्चिम), मुंबई | २८०१३८९९ |
| | १२)श्री. एस.टी. बोडखे | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-१२, दहीसर (पूर्व), मुंबई-६८ | २८९४३२०० |

| | | | |
|---|---|---|---|
| नवी मुंबई | श्री. विजय कांबळे | पोलीस आयुक्त, नवी मुंबई | २७,५७२,२०९<br>२७५७७९७९ |
| | श्री. अमर जाधव | पोलीस उपआयुक्त (परिमंडळे-[illegible]) नवी मुंबई | २७६५७४६५ |
| ठाणे | १) श्री. मधुकर पांडे | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ -१ ठाणे | २५३४२४३४ |
| | २) श्री. एस. डी. त्र्यंबके | पोलीस उपआयुक्त,परिमंडळ-२, भिवंडी, जिल्हा ठाणे | २५३९८१३१ |
| | ३) श्री. चेरींग दोरजे | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-३, कल्याण, जिल्हा-ठाणे | २५३३२५० |
| | ४) श्रीमती जी.आस्वती | पोलीस उपआयुक्त, परिमंडळ-४ उल्हासनगर, जिल्हा-ठाणे | २५४९२३४ |
| | ५) श्रीमती अर्चना त्यागी | पोलीस अधीक्षक, ठाणे (ग्रामीण) | २५३४३०२७ |
| रायगड | श्री. राजकुमार व्हटकर | पोलीस अधीक्षक, रायगड | २२२ ०९३ |
| रत्नागिरी | श्री. सी. एस. उघडे | पोलीस अधीक्षक, रत्नागिरी | २२५ ०७७ |
| सिंधुदुर्ग | श्री. के.एम.प्रसन्ना | पोलीस अधीक्षक, सिंधुदुर्ग | २२८ २०१ |